हायब्रीड व बासमती भात विकास कार्यक्रम
ही केंद्र पुरस्कृत योजना सन २००१-२००२ मध्ये
राबविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक:राईस १६०१/सीआर-५६/४-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २ जानेवारी,२००२.

**वाचा :-** १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक :राईस १६०१/सीआर-५६/४-अे, दिनांक ११ मे,२००१.

**प्रस्तावना :-**

हायब्रीड व बासमती भात विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना सन २००१-२००२ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधिन दिनांक ११ मे,२००१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या शासन निर्णयानुसार संकरीत भात व बासमती भाताकरिता बिजोत्पादन व वितरण या दोन्ही बाबींकरिता एकत्रित रुपये ७५००/- प्रति क्विंटल अनुदान वितरणानंतर देण्यात यावे अशा सुचना देण्यात आल्या आहेत. बासमती भाताकरिता दयावयाच्या अनुदानाच्या दरात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ११ मे,२००१ अन्वये संकरीत भात व बासमती भात बिजोत्पादन व वितरण या दोन्ही बाबींकरिता एकत्रित रुपये ७५००/- प्रति क्विंटल अनुदान वितरणानंतर देण्यात यावे असे आदेश देण्यात आले आहेत. याऐवजी आता बासमती भात बिजोत्पादन व वितरण या बाबींकरिता एकत्रितपणे रुपये ७००/- प्रति क्विंटल अनुदान वितरणानंतर देण्यात यावे असे आदेश देण्यात येत आहेत.

२. वरिल परिच्छेदात नमूद केलेल्या सुधारणा/बदलाव्यतिरिक्त दिनांक ११ मे,२००१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सर्व सूचना कायम आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दा. अं. कुलकर्णी )
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

GR 200201221255270000-0400

Adf - 1/(34)

~~GR 20020122123250000-0400~~